**राज्यातील सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या तसेच नव्याने स्थापन होणा-या सर्व तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्र, सायबर पोलीस स्टेशन तसेच सायबर घटक यांमध्य कार्यरत अधिकारी/कर्मचारी व अंमलदार यांचे गोपनीय अहवालाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१५/प्र.क्र.११९/विशा-३ अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १८ जानेवारी, २०१७.

**वाचाः** १) शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१५/ प्र. क्र.११९/ विशा-३अ, दिनांक-५ जानेवारी, २०१६
२) शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१५/ प्र. क्र.११९/ विशा-३अ, दिनांक-१२ जानेवारी, २०१६
३) शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१५/ प्र. क्र.११९/ विशा-३अ, दिनांक-३ मार्च, २०१६
४) शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१६/ प्र. क्र.५५/ विशा-३अ, दिनांक-१५ ऑक्टोंबर, २०१६
५) विशेष पोलीस महानिरिक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई यांचे पत्र क्र. सायबर व मअप्र/ वागोअ/२०१६/१७०७, दि.१६.११.२०१६

**प्रस्तावना:-**

राज्यातील सायबर गुन्ह्यांचे वाढते प्रमाण व त्यामुळे जनमानसावर होणारा परिणाम पाहता राज्यशासन व पोलीस यंत्रणेमध्ये सायबर गुन्हयांच्या संदर्भात अधिक परिणामकारक सुसूत्रता आणण्याकरीता व गुन्ह्यांचा शोध घेण्यामध्ये समन्वय आणण्यासाठी दि.५.१.२०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्य स्तरावर मुंबई येथे सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, हा एक महत्वाचा कक्ष स्थापन करण्यात आला आहे. तसेच सदरहू निर्णयान्वये सायबर व महिला अत्याचार कक्षाची कार्यकक्षा तसेच रुपरेषा स्पष्ट करण्यात आली आहे.

तदनंतर शासन निर्णय दि.३.३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्यात सध्या अस्तित्वात असलेले व भविष्यात निर्माण होणारे सर्व तंत्रज्ञान सहायित सायबर गुन्हे अन्वेषण कक्ष/लॅब, सायबर पोलीस स्टेशन, जिल्हा सायबर कक्ष, आयुक्तालय सायबर कक्ष व इतर पोलीस घटक (फक्त सायबर गुन्हे संदर्भात) विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध) यांना थेट प्रतिवेदीत (Report) करतील तसेच विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध) यांनी सायबर गुन्हयासंदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचना, निर्देशांचे सर्व संबंधितांनी पालन करणे बंधनकारक असेल तसेच विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध) हे सायबर गुन्हे व महिला अत्याचार प्रतिबंध याविषयासंबंधात अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, महाराष्ट्र शासन यांना थेट प्रतिवेदीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने मुंबईस्थित सायबर कक्ष हा अपर मुख्य सचिव, (गृह) यांच्या अधिपत्याखाली आणण्यात आला आहे. तसेच विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध), मुंबई यांनी वेळोवेळी दिलेल्या सूचना, निर्देशांचे सर्व संबंधितांनी पालन करणे बंधनकारक राहील, असे शासन निर्णयात नमूद केले आहे. तसेच राज्याच्या सायबर सुरक्षा प्रकल्पाची अंमलबजावणी या कार्यालयामार्फत करण्यात येत असून राज्यातील जिल्हा मुख्यालये, आयुक्तालये, तसेच इतर महत्वाच्या युनिटमध्ये स्थापन करण्यात आलेल्या सायबर लॅबना संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्र म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदरहू तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्रांची अंमलबजावणी सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्षामार्फत करण्यात येत असून सदरहू केंद्रे विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध), मुंबई यांचे अधिपत्याखाली आहेत. त्यानुसार राज्यातील सद्यस्थितीत अस्तित्वात असलेले तसेच नव्याने स्थापन करण्यात आलेले सर्व

तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्र, सायबर पोलीस स्टेशन, तसेच इतर सायबर युनिट मध्ये कार्यरत अधिकारी/ कर्मचारी तसेच अंमलदार यांच्या गोपनीय अहवालाबाबत प्रतिवेदन तसेच पुर्नविलोकन अधिकाराबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

दि.०५.०१.२०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावर मुंबई येथे सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, हा एक महत्वाचा कक्ष स्थापन करण्यात आला असून दि.०३.०३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्यात सध्या अस्तित्वात असलेले व भविष्यात निर्माण होणारे सर्व तंत्रज्ञान आधारित गुन्हे अन्वेषण कक्ष, सायबर पोलीस स्टेशन, जिल्हा सायबर कक्ष, आयुक्तालय सायबर कक्ष व इतर पोलीस घटक (फक्त सायबर गुन्हे संदर्भात) विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध) यांना थेट प्रतिवेदीत (Report) करतील तसेच त्यांनी सायबर गुन्हयासंदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचना, निर्देशांचे सर्व संबंधितांनी पालन करणे बंधनकारक असेल असे आदेश देण्यात आले आहेत. त्यानुसार खालील निर्णय घेण्यात येत आहे.

अ) ज्या सायबर घटकांचे प्रमुख विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई यांच्यापेक्षा कमी दर्जाचे असतील त्या तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण कक्ष, सायबर पोलीस स्टेशन, तसेच सायबर घटक यांमध्ये कार्यरत अधिकारी व अंमलदार यांचे गोपनीय अहवाल त्या घटकाचे प्रमुख (पोलीस अधीक्षक, पोलीस उपायुक्त इ.) हे प्रतिवेदीत करतील तर विशेष पोलीस महानिरिक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई हे पुर्नविलोकित करतील.

ब) ज्या सायबर घटकांचे प्रमुख विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई यांच्यापेक्षा वरिष्ठ दर्जाचे असतील त्या तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण कक्ष, सायबर लॅब, सायबर पोलीस स्टेशन, तसेच सायबर घटक यांमध्ये कार्यरत अधिकारी व अंमलदार यांचे गोपनीय अहवाल विशेष पोलीस महानिरिक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई हे प्रतिवेदीत करतील तर त्या घटकाचे प्रमुख (पोलीस आयुक्त, अपर पोलीस महनिरिक्षक इ.) हे पुर्नविलोकित करतील.

क) तसेच मुंबई येथील तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण कक्ष, सायबर पोलीस स्टेशन, तसेच सायबर घटकांमध्ये कार्यरत अधिकारी व अंमलदार यांचे गोपनीय अहवाल संबंधित घटकाचे पोलीस उपायुक्त हे प्रतिवेदीत करतील तर विशेष पोलीस महानिरिक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई हे पुर्नविलोकित करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११८१५०२३२४१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Suresh M. Khade

Digitally signed by Suresh M. Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4b9c3bfe0cf5832f9fb73e937c85ff f475ad0238a20da77ce26bb6669f386614, cn=Suresh M. Khade
Date: 2017.01.18 15:05:50 +05'30'

**( सुरेश खाडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, विशेष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. सर्व पोलीस आयुक्त
१०. सर्व पोलीस अधीक्षक
११. विशेष पोलीस महानिरीक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध व सायबर गुन्हे), मुंबई.
१२. उपसचिव, पोल-५ब, पोल-१अ, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपसचिव, विशा-३ अ, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती/गृह विभाग (विशा-३ अ).